**विभागीय चौकशी प्रकरणांचा जलदगतीने निपटारा होण्यासाठी उपाययोजना**

-------------------------------------------

संनियंत्रण अधिकाऱ्याची नियुक्ती आणि त्याची कर्तव्ये व जबाबदाऱ्या--

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण- १०१८/प्र.क्र.३०/११-अ**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक - २० जून, २०१८

वाचा -

(१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीडीआर- १६९१- प्र.क्र. १४९-९१-११-अ, दिनांक ५ जानेवारी, १९९३

(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीडीआर- २०००/ प्र.क्र. १०/ २०००/११- अ, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०००

शिस्तभंगविषयक कार्यवाहीमधील विभागीय चौकशीची प्रक्रिया विहित मुदतीत पूर्ण व्हावी या हेतूने चौकशीच्या प्रकरणांचे संनियंत्रण करण्यासाठी शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने त्याच्या कार्यालयातील वरिष्ठ अधिकाऱ्याची संनियंत्रण अधिकारी म्हणून नियुक्ती करावी असे निदेश वरील (१) येथील शासन परिपत्रक, दिनांक ५ जानेवारी, १९९३ अन्वये देण्यात आले आहेत. त्यानुसार जेथे संनियंत्रण अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आलेली नाही, तेथे अशी नियुक्ती त्वरेने करण्याबाबत वरील (२) येथील शासन परिपत्रक, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००० अन्वये सूचनाही देण्यात आल्या आहेत. विभागीय चौकशीच्या प्रकरणांचा त्वरेने निपटारा करण्याच्या दृष्टीने वरील आदेशांन्वये संनियंत्रण अधिकाऱ्यांवर सोपविलेल्या कर्तव्ये व जबाबदाऱ्यांचे पुनर्विलोकन करुन शासन आता खालीलप्रमाणे सुधारित आदेश देत आहे:

**शासन परिपत्रक**

(१) सर्व शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी त्यांच्या कार्यालयातील सध्या प्रलंबित असलेल्या तसेच भविष्यात सुरू होणाऱ्या विभागीय चौकशांच्या कामकाजासाठी संनियंत्रण अधिकाऱ्याची अद्याप नियुक्ती केली नसल्यास तातडीने एका वरिष्ठ अधिकाऱ्याची संनियंत्रण अधिकारी म्हणून नियुक्ती करावी आणि त्या संनियंत्रण अधिकाऱ्याचे नाव व पदनाम प्रशासकीय विभागास कळवावे. चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकाऱ्याच्या नियुक्ती आदेशांत न चुकता संनियंत्रण अधिकाऱ्याचे नाव व पदनाम नमूद करावे आणि त्या आदेशांच्या प्रती संनियंत्रण अधिकाऱ्यास अग्रेषित कराव्यात.

(२) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी शासनस्तरावरुन हाताळल्या जाणाऱ्या प्रकरणांसाठी संबंधित आस्थापनानिहाय संनियंत्रण अधिकारी नेमावेत. हे संनियंत्रण अधिकारी त्यांच्याकडे संनियंत्रणासाठी

सोपविलेल्या प्रकरणांच्या संनियंत्रणाशिवाय त्यांच्याशी संबंधित क्षेत्रिय कार्यालयातील संनियंत्रण अधिकाऱ्यांकडून चौकशी प्रकरणांच्या प्रगतीचे त्रैमासिक अहवालही मागवितील. मंत्रालय स्तरावरील संनियंत्रण अधिकाऱ्यांची नावे व पदनामे प्रशासकीय विभागांनी सामान्य प्रशासन विभागाला कळवावीत.

**संनियंत्रण अधिकाऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील:-**

(१) संनियंत्रण अधिकाऱ्याने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ मधील तरतुदींचे काळजीपूर्वक अवलोकन करुन विभागीय चौकशीच्या कार्यवाहीमधील वेगवेगळ्या टप्प्यांची माहिती करुन घ्यावी.

(२) चौकशी अधिकाऱ्यास त्याचे नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर विहित कालावधीत पहिल्या सुनावणीची कार्यवाही होईल यासाठी संनियंत्रण अधिकाऱ्याने पाठपुरावा करावा. त्यानंतर चौकशीच्या कार्यवाहीतील पुढील सर्व टप्पे विहित वेळेत सुरू होऊन पूर्ण केले जातील यावर त्याने लक्ष ठेवावे. यात अडचणी उद्भवल्यास त्याने शिस्तभंगविषयक प्राधिकारी /सादरकर्ता अधिकारी / चौकशी अधिकारी यांच्याशी संपर्क साधून अडचणीचे निराकरण करुन घ्यावे व प्रकरणास गती द्यावी.

(३) चौकशी प्रक्रियेदरम्यान वेगवेगळ्या टप्प्यांवर चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांनी काही बाबींची पूर्तता करण्यासाठी वा स्पष्टीकरणासाठी शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याशी केलेला सर्व पत्रव्यवहार संनियंत्रण अधिकाऱ्यासही अग्रेषित करावा. तसेच शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकाऱ्यांशी केलेला पत्रव्यवहार संनियंत्रण अधिकाऱ्यासही अग्रेषित करावा. तथापि, चौकशीतील पुराव्याची कागदपत्रे व चौकशीचा अहवाल संनियंत्रण अधिकाऱ्यास पाठविण्याची आवश्यकता नाही. संनियंत्रण अधिकाऱ्याने या पत्रव्यवहाराची दखल घेऊन त्यात नमूद केलेल्या बाबींची संबंधितांकडून पूर्तता केली जाईल यासाठी पाठपुरावा करावा.

(४) संनियंत्रण अधिकारी शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यास चौकशी प्रकरणाच्या प्रगतीचा मासिक अहवाल सादर करील. संनियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांच्या कर्तव्यांत कसूर केल्यास त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्यात येईल असे त्यांच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावे.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१८०६२२१८३६३१२००७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhatu Sambhu Wankhede

Digitally signed by Bhatu Sambhu Wankhede
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=493af62b137d3b8ad2fb93133b4b083c9cafb89b6793bfa8d7ebb7ba735e6d9d, serialNumber=454f1eaad82ae32f06775522a32735d46dc9a815a777254a802deaa980512d11, cn=Bhatu Sambhu Wankhede
Date: 2018.06.25 16:33:06 +05'30'

**(भ.सं.वानखेडे)**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,

२. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,
३. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव,
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
५. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा,
६. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद,
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
९. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,
१०. सर्व मंत्रालयीन विभाग,
११. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी,
१४. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
१५. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
१६. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१७. *सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
१८. *सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
१९. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२०. *आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
२२. सर्व विधीमंडळ सदस्य,
२३. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२४. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५. निवडनस्ती

--------------

* पत्राने